कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) यांना उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर पदोन्नती व पदस्थापना...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पीओजी-२०२४/प्र.क्र.१७०(भाग-१)/सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-२४.०७.२०२४

**शासन आदेश**

उप अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या **सन २०२१-२२ च्या निवडसूचीतील** खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) यांना कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) (वेतनश्रेणी:- S-१५:४१८००-१३२३००) संवर्गातून उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) या संवर्गात (वेतनश्रेणी:- S-२०:५६१००-१७७५००) या आदेशान्वये **तात्पुरत्या स्वरूपात उप अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या नियमित कोट्यात** पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नती नंतर संबंधितांची नियुक्ती त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्ये. क्र. | कनिष्ठ अभियंता (पदविधारक) यांचे नांव, जात प्रवर्ग | वाटप केलेला महसुली विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १. | ५१६ | श्री. प्रताप बाबुराव यादव, खुला | पुणे | सहायक संशोधन अधिकारी, जिल्हा प्रयोगशाळा, सोलापूर या रिक्त पदी |

२. उपरोक्त कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) यांना पुढील अटींच्या अधीन राहून उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर पदोन्नती देण्यात येत आहे:-

१. सदर पदोन्नती आदेश मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दिनांक २५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि/१६-ब कार्यासनाच्या दिनांक ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार करण्यात येत आहे. तसेच, दिनांक ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.
२. कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) संवर्गाच्या दिनांक १५.०६.२०२३ रोजीच्या ज्येष्ठता सूची विरूध्दच्या न्यायालयीन प्रकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.
३. तसेच, पदोन्नतीने नियुक्ती संदर्भात मा.न्यायाधिकरणात वा मा.न्यायालयात दाखल असलेल्या अन्य इतर याचिकेवरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.
४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.
५. सदर पदोन्नती आदेशातील जे अधिकारी पदोन्नती नाकारतील त्यांच्याबाबतीत सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

३. उपरोक्त नमूद अभियंत्यांविरूध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित/ न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत. तथापि, सदर अभियंत्याच्या विरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल असल्यास पदोन्नतीचे हे आदेश आपोआप रद्द होतील.

४. संबंधित मुख्य अभियंता यांना विनंती करण्यात येते की, सदर कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) यांना पदोन्नतीच्या आदेशानुसार पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

५. संबंधित कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) यांनी पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या पदावर **त्वरीत** रूजू व्हावे, अन्यथा सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि.१४.०७.२०२१ नुसार संबंधित कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) यांचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

६. संबंधीत मुख्य अभियंता यांना कळविण्यात येते की, पदोन्नत उप अभियंता पदोन्नतीच्या पदावर त्वरीत रुजू न झाल्यास वरील परि. ५ मध्ये नमूद केल्यानुसार शासन स्तरावर पुढील कार्यवाही करण्यासाठीचा प्रस्ताव त्वरीत शासनास सादर करावा.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२४११४९३३७३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.07.24 12:04:00 +05'30'

**( द. व. खारके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
३. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ
४. संबधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
५. मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन प्रशा-२,सेवा-१,सेवा-३,आस्थापना-१/३,सेवा-६,संगणक कक्ष,सा.बां.विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०. संबंधीत अधिकारी (ई-मेलद्वारे).
११. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती).